**पुराभिलेख संचालनालयातील कार्यालयीन कामाकरीता नवीन संगणक अद्यावत ठेवण्यासाठी लागणाऱ्या Quick Heal Antivirus Total Shield १ User ५ Year खरेदीस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मपुवि-२०१९/प्र.क्र.१२४/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०६ जानेवारी, २०२०.

वाचा : (१) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दि. २४ ऑगस्ट, २०१७.
(२) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१७/प्र.क्र.२०४/ उद्योग-४, दि. ०८ डिसेंबर, २०१७.
(३) शासन प रिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जूलै, २०१९.
(४) संचालक, पुराभिलेख संचालनालय यांचे पत्र क्र.भांडार/२०१९-२०/३६०९, दि.१२ डिसेंबर, २०१९.

**शासन निर्णय-**

पुराभिलेख संचालनलायातील कार्यालयीन कामाकरीता नवीन संगणक अद्यायावत ठेवण्यासाठी लागणाऱ्या Quick Heal Antivirus Total Shield १User ५ Year केंद्र शासनाने विकसित केलेल्या गर्व्हमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दतीनुसार खरेदी करण्यासाठी येणाऱ्या रु.४९,३००/-(अक्षरी रुपये एकोणपन्नास हजार तीनशे फक्त ) इतक्या रकमेच्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

आता या शासन निर्णयान्वये **रु.४९,३००/- (अक्षरी रुपये एकोणपन्नास हजार तीनशे फक्त)** इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** संचालक, पुराभिलेख संचालनालय, यांनी येथील उद्योग, उर्जा व कामगार विभागाने केंद्र शासनाने विकसित केलेल्या गर्व्हमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दतीनुसार वेळोवळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार सदरची खरेदी प्रक्रीया करण्यात यावी.

**०३.** संचालक, पुराभिलेख संचालनालय, यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास यासंबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

**०४.** हा शासन निर्णय विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३ /विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग दोन, अ.क्र. ०५, नियम क्र. ०७ नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं -२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८ जूलै, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, १०४, पुराभिलेख, (०१) (०२) पुराभिलेख कार्यालये (अनिवार्य) (२२०५ १७९५) २१ पुरवठा व सामग्री या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१०६१७०३३१७८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Sawant Balasaheb Ishwar
Date: 2020.01.06 17:06:33 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
२. सहाय्यक संचालक,(प्रशासन) पुराभिलेख संचालनालय, मुंबई
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा),मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. कार्यासन अधिकारी, (अर्थसं.) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती, सां.का.२.